चौथी आवृत्ती

# मराठी

# बालभारती

## इयत्ता पहिली

## भाग पहिला



शासन मंजुरी क्रमांक - पापुमं / १०९७ / १३६६४ / १ - भाषा/ स.पु. / दिनांक ७-२-१९९७.

## मराठी

# बालभारती

## इयत्ता पहिली

## भाग पहिला

नाव ______

शाळा ______

इयत्ता ______ तुकडी ______



महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे

प्रथमावृत्ती : १९९७

सुधारित आवृत्ती : १९९९

चौथे पुनर्मुद्रण : २००४



| | | |
|---|---|---|
| मराठी भाषा समिती | : | प्राचार्य राम शेवाळकर, अध्यक्ष<br>पद्मश्री दया पवार, सदस्य<br>श्री. व. द. देसाई, सदस्य<br>श्री. ह. गं. नारलावार, सदस्य<br>श्रीमती रेणू दांडेकर, सदस्य<br>श्रीमती वर्षा सहस्रबुद्धे, सदस्य<br>श्री. माधव राजगुरू, सदस्य-सचिव |
| संयोजन प्रमुख | : | माधव राजगुरू, विशेषाधिकारी, मराठी विभाग, |
| सहायक | : | श्रीमती उषादेवी देशमुख, विषय सहायक मराठी |
| चित्रकार | : | श्री. चंद्रकांत तजबिजे |
| मुखपृष्ठ | : | श्री. मुकुंद तळवलकर |
| अक्षरजुळणी | : | मुद्रा विभाग, पाठ्यपुस्तक मंडळ,<br>'बालभारती', सेनापती बापट मार्ग, पुणे - ४११ ००४. |
| निर्मिती | : | श्री. प्रमोद शिरोडकर, मुख्य निर्मिती अधिकारी<br>श्री. कमळाकर आगास्कर, निर्मिती अधिकारी |
| कागद | : | ५८.५ × ८६ सेमी, ५७ जी.एस्.एम्., क्रीमवोव्ह |
| मुद्रणादेश | : | N/Tech/2004-05/32/10.25 |
| मुद्रक | : | Ajanta Art Printers, Hyderabad. |
| प्रकाशक | : | रमेश द. धर्माधिकारी<br>नियंत्रक,<br>पाठ्यपुस्तक निर्मिती,<br>गोरेगाव (प.), मुंबई ४०० ०६२. |

# प्रस्तावना

'क्षमताधिष्ठित प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम-१९९५' नुसार पाठ्यपुस्तक मंडळाने मराठी बालभारती, इयत्ता पहिली हे पाठ्यपुस्तक १९९७ साली प्रकाशित केले. 'सरस-२००१' या प्रकल्पांतर्गत पहिलीच्या पुस्तकाची सुधारित आवृत्ती आपल्या हाती देताना आम्हांला विशेष आनंद वाटतो.

पहिलीचे पाठ्यपुस्तक जास्तीत जास्त निर्दोष व दर्जेदार व्हावे, या दृष्टीने महाराष्ट्राच्या सर्व भागांतील प्राथमिक शिक्षक आणि विषयतज्ज्ञ यांच्याकडून या पुस्तकाचे **प्रकाशनपूर्व** समीक्षण करण्यात आले होते. पुस्तक आहे, त्यापेक्षा अधिक निर्दोष, अधिक दर्जेदार आणि अधिक प्रभावी होण्यासाठी पाठ्यपुस्तक मंडळाने **प्रकाशनोत्तर** समीक्षणाचा ***'सरस-२००१'*** हा संशोधन प्रकल्प हाती घेतला. या प्रकल्पात पुढील चार मार्गांनी पुस्तकाचे समीक्षण करण्यात आले :-

१. महाराष्ट्रातील निवडक शाळांकडून चाचणीद्वारे वर्षभर प्रत्याभरण घेणे;

२. विषयतज्ज्ञांकडून परीक्षण करून घेणे;

३. संस्था व व्यक्ती पातळीवर संशोधन प्रकल्प घेणे; आणि

४. शिक्षक, पालक यांच्याकडून आलेली पत्रे, वृत्तपत्रातून छापून आलेली टीकात्मक परीक्षणे यांतील सूचनांचा विचार करणे.

सन १९९७-९८ या शैक्षणिक वर्षात वरील चारही मार्गांनी आलेल्या सूचना व अभिप्रायांचा विचार करून मराठी समितीने या पुस्तकाची सुधारित आवृत्ती या वर्षी तयार केली आहे.

*ही सुधारित आवृत्ती उपलब्ध करून देतानाच या पुस्तकाची दोन भागांत विभागणी करण्यात आली आहे. **सरस-२००१'** या प्रकल्पातील शाळांमधील शिक्षक आणि पालक यांच्याशी झालेल्या*

*अनौपचारिक चर्चेतूनच पहिल्या इयत्तेचे पुस्तक दोन भागांत छापण्याची कल्पना पुढे आली.*

*पहिलीच्या मुलांना वर्षातून किमान दोन ते तीन पुस्तके लागतात. हा पालकांवर अतिरिक्त भारच आहे. यावर उपाय म्हणून आहे तेच पुस्तक, त्याच किमतीत दोन भागांत उपलब्ध करून देण्याचा निर्णय झाला. ही दोन भागांतील पुस्तके सुरुवातीस केवळ पुणे जिल्ह्याकरिता होती. या पुस्तकाच्या उपयुक्ततेबाबत सर्वेक्षण घेण्यात आले, तेव्हा विद्यार्थी, शिक्षक आणि पालक यांच्या दृष्टीने दोन भागांतील पुस्तके अधिक सोईची असल्याचे आढळून आले; त्यामुळे प्रथम टप्प्याटप्प्याने विभागनिहाय आणि नंतर संपूर्ण राज्यासाठी ही दोन भागांतील पुस्तके उपलब्ध करून देण्यात आली आहेत.*

शिक्षकांचे अध्यापन नेमके आणि अधिक प्रभावी व्हावे; म्हणून पाठांवरील प्रत्येक स्वाध्यायास क्षमता क्रमांक आणि आवश्यक तिथे शिक्षकांसाठी सूचना दिलेल्या आहेत.

शिक्षकांप्रमाणेच पालकही विद्यार्थ्यांच्या स्वयंअध्ययनात मदत करू शकतील असे या पुस्तकाचे स्वरूप ठेवले आहे. मराठी समिती व चित्रकार यांच्या आस्थापूर्वक परिश्रमातून हे पुस्तक तयार झाले आहे. मराठी समितीचे आणि पाठ्यपुस्तक लेखनामध्ये ज्या शिक्षकांचे, तज्ज्ञांचे सहकार्य लाभले, त्या सर्वांचे मंडळ मनःपूर्वक आभारी आहे.

पालक, शिक्षक आणि विद्यार्थी यांच्या दृष्टीने अधिक उपयुक्त अशा या सुधारित आवृत्तीचे सर्वांकडून स्वागत होईल, अशी आशा आहे.

पुणे
दिनांक : १ जानेवारी, २०००
११ पौष, शके १९२१

(एन. के. राठोड)
**संचालक**
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे.

# क्षमताधिष्ठित अभ्यासक्रम आणि पाठ्यपुस्तके

गेल्या चाळीस-पन्नास वर्षांत शिक्षणाचा प्रसार खूप झाला; पण गुणवत्तेबाबत शाळा-शाळांमध्ये, प्रांता-प्रांतांमध्ये फरक पडला. गुणवत्तेबाबत उद्‌भवलेल्या या प्रश्नावर क्षमताधिष्ठित अध्ययन-अध्यापन हा एक उपाय आहे. प्राथमिक शिक्षण घेणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याला काय यायला हवे, याचा विचार म्हणजेच अध्ययन क्षमतांचा विचार. यात असे अपेक्षित आहे, की विद्यार्थ्यांनी जास्तीत जास्त क्षमता प्राप्त केल्या पाहिजेत. विद्यार्थ्यांच्या वर्तनात अपेक्षित बदल दिसून आला, तर त्याने संबंधित विशिष्ट क्षमता प्राप्त केली असे म्हणता येईल; मात्र हा बदल टिकाऊ स्वरूपाचा असला पाहिजे. हे टिकाऊ स्वरूपाचे बदल घडवूनच प्राथमिक शिक्षणात गुणात्मक सुधारणा करता येईल.

अभ्यासक्रमाच्या (क्षमताधिष्ठित प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम-१९९५) विविध क्षेत्रांमध्ये क्षमतांच्या विकसनाचे जे टप्पे दर्शवलेले आहेत ते परस्परावलंबी आहेत, त्यातील संबंध लक्षात घेऊन पाठ्यपुस्तकाची श्रेणीबद्ध रचना करण्यात आलेली आहे; म्हणूनच प्रत्यक्ष अध्यापनाच्या वेळी पाठ्यपुस्तकातील क्रम तोच ठेवायचा आहे.

क्षमताधिष्ठित अध्यापन हा काही अध्यापनातील पूर्णतया नवीन प्रयोग किंवा नवीन सिद्‌धान्त नाही; परंतु आता अभ्यासक्रमात नमूद केलेल्या क्षमता, वर्गातील प्रत्येक विद्यार्थ्याला प्रभुत्व पातळीवर प्राप्त झाल्या पाहिजेत, यासाठी प्रयत्न करायचे आहेत. अपेक्षित कृती विद्यार्थ्याला अचूकतेने, सहजतेने आणि योग्य त्या गतीने करता आली, म्हणजे त्याने संबंधित क्षमतेची प्रभुत्वपातळी गाठली असे म्हणता येईल. पाठ्यपुस्तकाचा वापर क्षमतेवरील प्रभुत्वासाठी करायचा आहे. त्यासाठी पाठ्यपुस्तकातील सामग्रीबरोबरच शिक्षकाने स्वत: तयार केलेले साहित्यही वापरणे अपेक्षित आहे.

शिक्षकांचा हेतू केवळ पाठ्यपुस्तक संपवणे असा असता कामा नये, वर्गातील सर्व विद्यार्थ्यांना विशिष्ट क्षमता प्राप्त करून देणे हा असावा. जरूर तेथे अध्यापनाचा वेग कमी-जास्त करून तसेच उजळणी, नवीन उपक्रम, विविध स्वाध्याय इत्यादींचा वापर करून साध्य करायचा आहे.

वर्गातील सर्व विद्यार्थी विशिष्ट क्षमतेकडे बरोबरीने जावेत, यासाठी पाठ्यपुस्तकात अनेक प्रकारचे स्वाध्याय, उपक्रम आणि कृती दिलेल्या आहेत. त्या कशा घ्यायच्या याच्या सूचनाही दिलेल्या आहेत. विद्यार्थी क्षमता संपादनाच्या कोणत्या टप्प्यावर आहेत आणि संपादन केलेली क्षमता टिकून आहे की नाही, याचे मूल्यमापन सातत्याने करायचे आहे. एखादी क्षमता प्राप्त झाली नाही किंवा टिकून राहिली नाही असे आढळल्यास उपचारात्मक उपक्रमांची सोय केली पाहिजे. पाठ्यपुस्तकात नमुना चाचणी प्रश्न दिले आहेत. त्या प्रश्नांचा तसेच त्या धर्तीवर तयार केलेल्या जास्तीच्या प्रश्नांचा शिक्षकांनी वापर करावा. क्षमताधिष्ठित अध्यापनाचा आणखी एक विशेष म्हणजे प्राप्त झालेल्या क्षमतेचा वापर विद्यार्थ्यांना बाह्य जगात करता येणे. मूल्यमापनात या उपयोजनाचाही समावेश शिक्षकाने केला पाहिजे.

विद्यार्थ्याला होणारी क्षमतेची प्राप्ती वैयक्तिक आहे; मात्र त्याने ती संपादन करण्याची प्रक्रिया सांघिक आहे. त्या स्वरूपाच्या अध्यापनातून गुणवत्तेमध्ये समानता येणे आणि अध्ययनात सांघिक भावना वाढणे असा दुहेरी फायदा होईल अशी अपेक्षा आहे.

## क्षमतांची यादी

| क्षेत्र | क्षमता क्र. | क्षमता |
|---|---|---|
| श्रवण | १.१.१ | सोपी, परिचित व आवडीची बडबडगीते, कविता व गोष्टी समजपूर्वक ऐकता येणे. |
| | १.१.२ | परिचित प्रसंगातील संभाषण व संवाद समजून ऐकता येणे. |
| | १.१.३ | परिचित (नेहमीच्या) प्रसंगात केलेली तोंडी विनंती व दिलेल्या सूचना समजणे. |
| भाषण/संभाषण | २.१.१ | ऐकलेली साधी वाक्ये बिनचूकपणे म्हणता येणे. |
| | २.१.२ | योग्य कृती आणि अभिनय करून बडबड गीते, सोपी गाणी व कविता समूहात म्हणता येणे. |
| | २.१.३ | विचारलेल्या सोप्या प्रश्नांची उत्तरे देणे. |
| | २.१.४ | सोपे प्रश्न विचारता येणे. |
| वाचन | ३.१.१ | वाचनात पुन्हा पुन्हा येणारी मुळाक्षरे, बाराखडीतील अक्षरे तसेच सोपी जोडाक्षरे स्वतंत्रपणे किंवा शब्दात आल्यास ओळखता येणे. |
| | ३.१.२ | छापील व हस्तलिखित मोठी अक्षरे वाचता येणे. |
| | ३.१.३ | परिचित शब्द तसेच छोटी वाक्ये अर्थ समजून मोठ्याने वाचता येणे. |
| लेखन | ४.१.१ | वाचनात वारंवार येणारी मुळाक्षरे, बाराखडीतील अक्षरे तसेच सोपी जोडाक्षरे पाहून लिहिता येणे. |
| | ४.१.२ | अधिक वापरात असलेली मुळाक्षरे, बाराखडीतील अक्षरे तसेच सोपी जोडाक्षरे ऐकून लिहिता येणे. (श्रुतलेखन) |
| | ४.१.३ | सोपे परिचित शब्द आणि साधी वाक्ये स्वत:हून लिहिता येणे. |
| आकलन | ५.१.१ | तोंडी सांगितलेली माहिती पुन: सांगता येणे. |
| (ऐकून व वाचून) | ५.१.२ | ऐकलेल्या मजकुरावर आधारित प्रश्नांची उत्तरे देता येणे. |
| कार्यात्मक व्याकरण | ६.१.१ | समान अक्षराने शेवट होणारे शब्द ओळखता येणे. |
| स्वयंअध्ययन | ७.१.१ | शब्द, चित्रपट्ट्या, (सोप्या) चित्रकोशाचा उपयोग करता येणे. |
| भाषा-व्यवहारात उपयोग | ८.१.१ | लहान किंवा मोठ्या आणि समवयस्क व्यक्तींशी बोलताना उचित शब्दांचा वापर करता येणे. |
| शब्दसंपत्ती | ९.१.१ | सुमारे १५०० शब्दांचे आकलन होणे. |

## शिक्षक आणि पालकांसाठी

अर्थपूर्ण वाचनाची योग्य गती प्राप्त होण्यासाठी मुलांच्या मनात शब्द प्रतिमा सहजतेने निर्माण कराव्या लागतात. त्यासाठी शब्द प्रतिमांचा सहसंबंध वस्तू / चित्र यांच्याशी सुरुवातीच्या काळात सातत्याने साधला जावा. हा सहसंबंध अधिक गतिमान व अर्थपूर्ण होण्यासाठी प्रसंगचित्रांची मदत अधिक उपयुक्त ठरते; म्हणूनच मुलांच्या अध्ययनाची सुरुवात त्यांच्या भावविश्वाशी संबंधित प्रसंगचित्राने करावी. चित्रवाचनाची सवय मुखपृष्ठापासूनच मुलांना लावावी व त्यांना बोलते करावे.

प्रथम प्रसंगचित्रांचे वाचन, त्यांतील वस्तुचित्रांचे वाचन, ,वस्तुचित्रांचा शब्दचित्रांशी सहसंबंध जोडून शब्दचित्रांचे वाचन. त्यानंतर त्या शब्दचित्रातील अक्षरांचा परिचय व वाचन नंतर शब्दवाचन असा स्वाभाविक क्रम १ ते ११ पाठांत आहे. त्यामुळे मुळाक्षरांचा, स्वरचिन्हांचा परिचय झाल्यानंतर १२ व्या पाठात मुळाक्षरांचा योग्य क्रम दिला आहे.

चौथ्या पाठापासून लेखनासाठी सारख्या वळणाच्या अक्षरांचे गट शक्यतो सोयीचे ठेवलेले आहेत. जी अक्षरे शिकून झालेली आहेत, ती वळणानुसार गटात विभागून दिलेली आहेत.

विद्यार्थ्यांच्या भाषिक विकासात शब्दसंपत्तीवरील प्रभुत्व वाढीकडे लक्ष पुरवावे. दैनंदिन जीवनाशी निगडित अशा परिसरातील शब्दांबरोबरच परिसराबाहेरील शब्दांचीही भर टाकावी. उदा. पापडी, ऐरण, इत्यादी. नवनवीन शब्दांची ओळख विद्यार्थ्यांना करून देण्यात शिक्षकांनी पुढाकार घ्यावा. अंबारीसारख्या शब्दातून आपल्या सांस्कृतिक इतिहासाची माहिती देता येते.

प्रत्येक पाठाखाली आणि पाठांच्या स्वाध्यायांना दिलेले क्रमांक अभ्यासक्रमातील क्षमतांचे आहेत. त्या क्षमतांची यादीही या पुस्तकात दिली आहे. ती पालकांनी समजून घ्यावी.

# अनुक्रमणिका

# चांदोबा पाण्यात पडला













प्रथम मुलांना चित्रांचे निरीक्षण करायला सांगावे. नंतर प्रश्न विचारावेत आणि प्रश्न विचारण्यास प्रवृत्त करावे. त्या अनुषंगाने गोष्ट सांगावी. ऐकवलेल्या गोष्टीवर प्रश्न विचारावेत.

१.१.१, १.१.२, २.१.३, २.१.४, ५.१.२

# मोरा रे मोरा

मोरा रे मोरा
काय तुझा तोरा
रंगीत पिसारा
डोक्यावर तुरा
बघ वर बघ
काळे काळे ढग
एक पाय दुमडून
पिसारा फुलवून
नाच तर खरा
मोरा रे मोरा



– सरिता पदकी

गाणे चालीवर म्हणून दाखवावे. शिक्षकांनी एकेक ओळ म्हणावी, तीच ओळ मुलांनी म्हणावी. योग्य कृती व अभिनय करून मुलांकडून समूहात आणि स्वतंत्रपणे म्हणवून घ्यावे.

१.१.१, २.१.१, २.१.२

मुलांना चित्रे ओळखता येतील. शब्दही माहीत असतील, पण ते शब्द वा त्यांतील सुटी अक्षरे त्यांना वाचता येण्याची आवश्यकता नाही. शब्दांकडे ते चित्राकृती म्हणून पाहतील व आकारसाम्य ओळखतील.

■ पाहा.


मांजर


खार


गाय


मासा

■ जोड्या जुळवा.






| खार | मांजर | मासा | गाय |
|---|---|---|---|

■ योग्य ठिकाणी गोल करा.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| खार | (खार) | मांजर | मासा | गाय | खार |
| मासा | मासा | खार | मासा | गाय | मांजर |
| गाय | मांजर | गाय | खार | मासा | गाय |
| मांजर | मासा | मांजर | गाय | मांजर | खार |

■ पाहा.



लाल पिवळा निळा काळा हिरवा

■ जोड्या जुळवा.



लाल निळा काळा हिरवा पिवळा

■ जोड्या जुळवा.

हिरवा लाल हिरवा काळा

पिवळा काळा

लाल निळा निळा

पिवळा

# एकीचे बळ






प्रथम मुलांना चित्रांचे निरीक्षण करायला सांगावे. नंतर प्रश्न विचारावेत. प्रश्न विचारण्यास प्रवृत्त करावे. त्या आधारे गोष्ट सांगावी. ऐकवलेल्या गोष्टीवर प्रश्न विचारावेत.

१.१.१, १.१.२, २.१.३, २.१.४, ५.१.२

# भिंगरी

एक होती भिंगरी
तिचे नाव झिंगरी



भिरभिर फिरते गोल गोल
फिरता फिरता जातो तोल
तिला आहे एकच पाय
पायावरती गिरकी खाय



गिरकी घेऊन आली चक्कर
भिंतीवरती बसली टक्कर





| गाणे चालीवर म्हणून दाखवावे. शिक्षकांनी एकेक ओळ म्हणावी. तीच ओळ मुलांनी म्हणावी. योग्य कृती व अभिनय करून मुलांकडून समूहात आणि स्वतंत्रपणे म्हणवून घ्यावे. |
|---|
| १.१.२, २.१.१, २.१.२ |

मुलांना चित्रे ओळखता येतील. शब्द माहीत असले तरी शब्द व त्यांतील सुटी अक्षरे वाचता येण्याची आवश्यकता नाही. शब्दांकडे व स्वरांच्या खुणांकडे ते चित्राकृती म्हणून पाहतील व आकारसाम्य ओळखतील.

पाहा.

|  |  |  |  |  |
| --- | --- | --- | --- | --- |
| चेंडू | भोवरा | बाहुली | पतंग | पुस्तक |

जोड्या जुळवा.

    

भोवरा चेंडू पुस्तक बाहुली पतंग

भोवरा चेंडू
पुस्तक
बाहुली
पतंग

बाहुली पतंग
पुस्तक
चेंडू भोवरा

■ ओळखा. जोड्या जुळवा.

| आई | बाबा | आजोबा | दादा | मावशी |
|---|---|---|---|---|

| आजोबा | दादा | आई | मावशी | बाबा |
|---|---|---|---|---|

| मजा | मोजा | ओढ | ओढे |
|---|---|---|---|
| मोजा | मजा | ओढा | ओढा |
| मोजू | मोजे | ओढे | ओढू |
| मोजे | मोजू | ओढू | ओढ |

■ जोड्या जुळवा.

| ा | ि | ी | ु | ू |
|---|---|---|---|---|

| ि | ु | ा | ू | ी |
|---|---|---|---|---|

| े | ै | ो | ौ | ं |
|---|---|---|---|---|

| ै | ौ | े | ं | ो |
|---|---|---|---|---|

# कोल्हा आणि द्राक्षे













प्रथम मुलांना चित्रांचे निरीक्षण करायला सांगावे. नंतर प्रश्न विचारावेत. प्रश्न विचारण्यास प्रवृत्त करावे. त्या आधारे गोष्ट सांगावी. ऐकवलेल्या गोष्टीवर प्रश्न विचारावेत. मुलांकडूनही गोष्ट सांगून घ्यावी.

१.१.१, २.१.३, २.१.४, ५.१.२, ५.१.१

# झू झू झोपाळा



झू झू झोपाळा
नेऊ चला आभाळा
झोका जाई वर वर
वारा येई भरभर
झोका गेला उंच
खूप खूप उंच
झोक्यावर बसू
खुदूखुदू हसू
छान छान गाणी गाऊ
खूप खूप झोके घेऊ



– राजा मंगळवेढेकर

गाणे चालीवर म्हणून दाखवावे. शिक्षकांनी एकेक ओळ म्हणावी. तीच ओळ मुलांनी म्हणावी. योग्य कृती व अभिनय करून मुलांकडून समूहात आणि स्वतंत्रपणे म्हणवून घ्यावे.

१.१.१, २.१.१, २.१.२







प्रथम मुलांना चित्रांचे निरीक्षण करण्यास सांगावे. चित्रांच्या आधारे प्रश्न विचारून मुलांना बोलते करावे. त्यांना प्रश्न विचारण्यास प्रवृत्त करावे. नंतर गोष्ट ऐकवावी. ऐकवलेल्या गोष्टीवर प्रश्न विचारावेत.

१.१.१, १.१.२, २.१.३, २.१.४, ५.१.२

# अक्षरांचे अवयव

| पाहा | गिरवा | काढा |
|---|---|---|
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |
| | | |

वरील रेषा व अर्धवर्तुळे योग्य दिशेने वारंवार पाटीवर काढून घ्यावीत. या अवयवांच्या साहाय्याने १ ते ९ अंकही सहजतेने काढता येतील.

# नमुना चाचणी पहिली

(एकेका क्षमतेसाठी किमान पाच प्रश्न विचारावेत.)

- **खालील शब्द शिक्षकाने म्हणावे. विद्यार्थी स्पष्ट उच्चारासहित आपल्यामागून म्हणू शकतो का ते पाहावे.** (२.१.१)

भिंगरी, झिंगरी, गिरकी, फिरकी, चक्कर, टक्कर, झरझर, भरभर, खुदूखुदू, झोपाळा, पतंग, पुस्तक, वर्ग

- **खालील प्रश्नांची तोंडी उत्तरे विद्यार्थ्याने देणे अपेक्षित आहे.** (२.१.३)

(१) तुझं नाव काय ?
(२) तुझ्या घरी कोण कोण आहे ?
(३) तुमच्या घरी जेवायला काय काय करतात ?
(४) शाळेत यायच्या आधी तू काय काय करतोस / करतेस ?
(५) आपल्या शाळेचं नाव काय ?
(६) शाळेत तुझे कोण कोण मित्र-मैत्रिणी आहेत ?

- **पुस्तकातील चित्रकथांवर आधारित प्रश्न विचारावेत. त्यावेळी पुस्तकातील चित्रे दाखवावीत.**

जसे — या चित्रात तुला काय काय दिसते ? (२.१.३)
या गोष्टीत कोण कोण आहे ? (५.१.२)
या चित्रावरून गोष्ट सांगा. (५.१.१)

- **पाहा. जोड्या जुळवा.** (आकारसाम्य ओळखणे.)

| माठ | मीठ |
|---|---|
| मोठा | माठ |
| मूठ | मोठा |
| मीठ | मूठ |

| पतंग | रंगत |
|---|---|
| पंगत | पतंग |
| रंगत | संगत |
| संगत | पंगत |

- **शिक्षकाने एकेक ओळ सांगावी. विद्यार्थी मागून म्हणू शकतो का हे पाहावे.** (२.१.१)

चिमुकलं बाळ रांगत आलं
मांडीवर बसलं, खुदकन हसलं

चिमुकलं पाखरू अंगणात आलं
दाणे टिपून, नाचून गेलं

भिंगरी फिरली गोल गोल
चक्कर येऊन गेला तोल

- **सामूहिकपणे कृती करून, तुम्हांला येणारे बडबडगीत म्हणा.** (२.१.२)

१. | आ | घ | ई | र |





घर



आई

| आई | घर |
|---|---|

| आ | ई | घ | र |
|---|---|---|---|

२.१.१, ३.१.१, ३.१.२, ३.१.३

मुलांना प्रसंगचित्राचे निरीक्षण करायला सांगावे. त्यावर आधारित प्रश्न विचारून पार्श्वभूमी तयार करावी. त्याखाली घराचे, आईचे चित्र आणि घर, आई हे शब्द दिले आहेत. प्रथम चित्र, नंतर शब्द पाहायला सांगावे. चित्राच्या साह्याने घर, आई हे शब्द आधी शिक्षकांनी व नंतर मुलांनी म्हणावे. पुरेशा सरावानंतर घर, आई या शब्दांतील घ, र, आ, ई या अक्षरांची ओळख करून द्यावी. स्वाध्यायातून घ, र, आ, ई यांचे दृढीकरण करून घ्यावे. १ ते ११ पाठ याच पद्धतीने शिकवावेत.

## स्वाध्याय

- चित्रे पाहा. ओळखा. त्याखालील 'घ' अक्षरावर गोल (O) करा. जसे — (३.१.१)



घर







घरटे घड्याळ घसरगुंडी

■ खालील शब्दांतील 'र' खाली रेघ ओढा. (३.१.१)

जसे – **ग<u>र</u>ग<u>र</u>**

**घरघर भरभर सरसर**

■ चौकोनातील अक्षर ओळखा व त्या अक्षराभोवती गोल करा. (३.१.१)

जसे - [ई] घ (ई) आ र

**[घ] आ र घ र ई घ**

**[र] ई आ र घ र ई**

**[ई] घ ई आ र ई आ**

**[आ] र आ घ ई घ आ**

■ गोलाबाहेरील अक्षरे गोलातील सारख्या अक्षराशी जोडा. (३.१.१)



२.

| प | ण | फ | स |
|---|---|---|---|



पपई



फणस

फणस पपई

ण प स फ

रस सण आण सई

२.१.१, ३.१.१, ३.१.२, ३.१.३

मागील पाठातील अक्षरे आणि या पाठात आलेली अक्षरे यांच्या साह्याने तयार होणारे नवीन शब्द या पाठात शेवटी दिले आहेत, हे मुलांच्या लक्षात आणून द्यावे. २ ते १० या पाठांमध्ये याच पद्धतीने शिकवलेल्या सर्व अक्षरांपासून तयार होणारे नवीन शब्द त्या त्या पाठाखाली दिले आहेत. शक्य तिथे लहान लहान वाक्ये दिलेली आहेत, त्यांचे वाचन घ्यावे.

## स्वाध्याय

- सारखी दिसणारी अक्षरे जोडा. वाचा. (३.१.१, ३.१.२)




- ऐका. म्हणा. वाचा. (२.१.१, ३.१.३)

**फसफस घणघण रपरप**

**फरफर सरसर घरघर**

- वरील शब्दांत सर्वांत जास्त वेळा आलेले अक्षर कोणते ते दाखवा/सांगा. (३.१.३, ३.१.१)

- गोलातील अक्षर ओळखा व त्या अक्षराभोवती (O) गोल करा. (३.१.१)

जसे —

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| प | प | ट | ण | प | फ | क | च | प |
| फ | ण | फ | स | ण | फ | ई | घ | र |
| ण | प | ण | फ | स | ण | च | म | आ |
| स | स | प | स | ण | फ | घ | ई | र |

- वाचा. (३.१.३)

आई घर फणस पपई

सई, पपई आण.



३. | अ | न | ऊ |
|---|---|---|





अननस



ऊस

ऊस    अननस

ऊ    अ    न

ऊन    नऊ

२.१.३, ३.१.१, ३.१.२, ३.१.३

## स्वाध्याय

- गोलातील अक्षर पाहा. वाचा. पुढील शब्दांतील त्या अक्षराभोवती (O) गोल करा. (३.१.२, ३.१.१)

जसे – (न) का(न)

| | | | | |
|---|---|---|---|---|
| न | नळ | धन | मान | लहान |
| आ | आज | आई | आपण | आला |
| र | दार | घर | चार | बाजार |
| ऊ | मऊ | ऊन | ऊस | जाऊ |
| स | सई | ऊस | पसर | हास |
| अ | अजय | अहाहा | अबब | अमिता |

- शब्द वाचा. जोड्या जुळवा. (३.१.३)






पपई ऊस फणस अननस

वाचा. (३.१.३)

# ऊन आसन सनई आपण

वाचा. जोड्या जुळवा. (३.१.२, ३.१.१)

| | | |
|---|---|---|
| न | ऊ | ऊ |
| स | स | आ |
| | प | प |
| | न | |
| | आ | |

| | | |
|---|---|---|
| ई | अ | अ |
| ण | ई | फ |
| र | फ | |
| | ण | |
| | र | |

पुढील मुद्द्यांना धरून मुलांना बोलते करावे. (२.१.३)

- माहीत असलेल्या फळांची नावे
- फळांचा आकार, रंग, चव
- सालीसकट खाण्याची फळे
- सोलून खाण्याची फळे
- बियांसकट खाण्याची फळे
- बिया काढून खाण्याची फळे

## ४. म त क ब



समई तबक

तबक समई

म त ब क

बस नमन कसरत

या पाठापासून ११ व्या पाठापर्यंत स्वाध्यायात अक्षरे लिहायला दिली आहेत. अक्षरे गिरवण्याचा, नंतर लिहिण्याचा सराव द्यावा.

३.१.१, ३.१.२, ३.१.३, १.१.१, २.१.१, ४.१.१

## स्वाध्याय

- म, त, ब, क ही अक्षरे असलेले आणखी शब्द सांगा. (९.१.१)

जसे – **म – मन काम | क – कप नाक**

**ब – बबन तबला | त – तव्रा भात**

- चौकोनातील अक्षर वाचा. पुढील शब्दांतील त्या अक्षराखाली रेघ ओढा. (३.१.२, ३.१.१)

जसे – **म** **चमचम रमतगमत गरम**

**त** **रतन दात हात तलवार**

**क** **कप पाक कपाट झाकण**

**ब** **बडबड साबण बदक बगळा**

- वाचा. (३.१.३)

**कप अमर रतन सरक पसर**

- पाहा. समजून घ्या. गिरवा. लिहा. (४.१.१)

**प**

**फ**

**ण**

- दिलेल्या अक्षरांतून जास्तीत जास्त शब्द बनवा. सांगा. (१.१.१)

जसे –

## सण

## सरबत

## कसरत

## घसर




- ऐका. म्हणा. वाचा. (२.१.१, ३.१.३)

## रतन बस. आई, सरबत कर.

## अमर, सरबत आण.



## ५. ग द व ा













| बदक | मगर | कासव | मासा |
|---|---|---|---|

ग   द   व   क + ा = का

दार   वाघ   कागद   गरम

३.१.१, ३.१.२, ३.१.३, ४.१.१, २.१.३

या पाठात ग, द, व या अक्षरांबरोबरच काना ' ा' या स्वरचिन्हाची ओळख करून द्यायची आहे. ५ व ७ ते ११ या पाठांत वेगवेगळी स्वरचिन्हे आली आहेत. त्या अक्षरांना त्या त्या पाठांतील स्वरचिन्हे जोडून वाचनाचा सराव दिलेला आहे. त्याबरोबरच मागील पाठात झालेल्या अक्षरांनाही त्या त्या पाठातील स्वरचिन्हे जोडून वाचनाचा सराव द्यावा.

## स्वाध्याय

- वाचा. (३.१.३)

**वन नगर मदन गवत**

- चित्रात काय दिसते, ते सांगा.







- पाहा. समजून घ्या. वाचा. (३.१.२)

**ग + ा = गा द + ा = दा व + ा = वा**

**स + ा = सा म + ा = मा**

- खालील अक्षरांना काना (' ा' हे चिन्ह) जोडा. तयार झालेले शब्द वाचा. (३.१.३)

**ब ब द द क क म म**

■ जोड्या जुळवा. वाचा. (३.१.३)

| गर | दर | घर | वर | रस |
|---|---|---|---|---|

| दार | गार | घार | रास | वार |
|---|---|---|---|---|

■ मधल्या अक्षराला काना (' ा ') जोडा. शब्द वाचा. (३.१.३)

जसे – **वर त - वरात**

**कम न** **नग रा**

**पर त** **बद म**

■ पाहा. समजून घ्या. गिरवा. लिहा. (४.१.१)

**व**

**ब**

**क**

■ मुलांना माहीत असलेल्या प्राण्या-पक्ष्यांविषयी पुढील मुद्द्यांना धरून मुलांना बोलते करावे. (२.१.३)

• कसे दिसतात ? • कोठे राहतात ? • काय खातात ?

६. | उ | ऐ | औ | ळ | ख |





उखळ



ऐरण



औत

ऐरण  औत  उखळ

उ  ख  ळ  औ  ऐ

खार  बाळ  ऐक  उमा

३.१.१, ३.१.२, ३.१.३, ४.१.१, ५.१.२, ९.१.१

## स्वाध्याय

- खालील अक्षरे योग्य क्रमाने जुळवून तयार झालेला शब्द सांगा. (१.१.१)

जसे – **व ग त – गवत**

**म क ळ** **ळ ख उ** **त औ**

**ऐ ण र** **स का व**

- चौकोनातील अक्षरे वाचा. पुढील शब्दांतील त्या अक्षराखाली रेघ ओढा. (३.१.२, ३.१.१)

जसे – **ग** **कागद** **गवत**

| | | |
|---|---|---|
| **उ** | **उसळ** | **उकाडा** |
| **ख** | **साखर** | **खडा** |
| **ळ** | **कळप** | **नळ** |
| **औ** | **औषध** | **औत** |
| **ऐ** | **ऐक** | **ऐरावत** |

- वाचा. (३.१.३)

**खळ** **खळखळ** **उखळ**

**सळ** **सळसळ** **उसळ**

■ पाहा. समजून घ्या. गिरवा. लिहा. (४.१.१)

र

स

ख

उ

ऊ

ळ

■ उ, ख, ळ ही अक्षरे रिकाम्या जागी योग्य ठिकाणी लिहा. शब्द वाचा. (४.१.१, ३.१.३, ५.१.२, १.१.१)

फरा ........

........ सळ

खळ ........ ळ

ज्या अक्षरांचा परिचय पाठ क्र. १ ते ६ मध्ये करून दिला आहे, त्यांतील काही अक्षरांचे लेखन खाली दिले आहे.

■ पाहा. समजून घ्या. गिरवा. लिहा. (४.१.१)

ग

म

न

त

अ

आ

७. | झ | ढ | ओ | ी |







झगा ओढणी

ओढणी झगा

ढ झ ओ ण + ी = णी

गाणी गीता बासरी ओळख

२.१.४, ३.१.१, ३.१.२, ३.१.३, ४.१.१, ८.१.१

या पाठात स्वाध्यायात प्रथमच शब्द लिहायला दिलेले आहेत. यापुढील प्रत्येक पाठात वाचनाबरोबर लेखनाचा सराव द्यावा. लेखनासाठी पाटीचाही वापर करावा.

## स्वाध्याय

- पाहा. समजून घ्या. वाचा. (३.१.२)

ढ + ी = ढी

ळ + ी = ळी

झ + ी = झी

त + ी = ती

- वाचा. (३.१.३)

ढग – ढीग

नळ – नीळ

वर – वार – वीर

बळ – बाळ – बीळ

- वाचा. (३.१.३)

ओढा झरा

झारी पाणी

■ वाचा. (३.१.३)

**रस आण.**

**कपात ओत.**

**मामी रस पी.**

■ पाहा. समजून घ्या. गिरवा. लिहा. (४.१.१)

**ओ**

**औ**

**ढ**

■ शेवटच्या अक्षराला वेलांटी ('ि') जोडा. शब्द पुन्हा लिहा. वाचा. (४.१.१, ३.१.३)

**पळ** **कळ** **फळ**

■ शिक्षकांनी शिंप्याला वर्गात बोलवावे. त्यांना प्रश्न विचारून त्यांच्या व्यवसायाची माहिती घेण्याविषयी मुलांना मार्गदर्शन करावे. (२.१.४, ८.१.१)

८. | य | ज | ड | ए | ु |
|---|---|---|---|---|



गाय

एक




सुगरण

झाड



अजगर

एक    गाय    अजगर

यं   ज   ड   ए   स + ु = सु

तुळस गजर गायन झाड

३.१.१, ३.१.२, ३.१.३, ४.१.१, १.१.१, २.१.१

## स्वाध्याय

- चौकोनातील अक्षर वाचा. पुढील शब्दांतील त्या अक्षराखाली रेघ ओढा. (३.१.२, ३.१.१)

| | | | |
|---|---|---|---|
| ड | दगड | कडक | पडझड |
| ज | वजन | जवान | आज |
| य | पाय | साय | गायक |
| ए | एक | एकदा | एवढा |

- पाहा. समजून घ्या. वाचा. (३.१.२)

क + ु = कु      र + ु = रु

- वाचा. (३.१.२, ३.१.३)

म - मु - मुसळ

क - कु - कुदळ

र - रु - रुपया

प - पु - पुतळा

ख - खु - खुळखुळा

■ खालील अक्षरे वाचा. ती अक्षरे असणारे एकेक शब्द सांगा. (३.१.२, १.१.१)

जसे – **आ - आवळा ई - समई**

**य झ ड र ज ख ए ग न म**

■ पाहा. समजून घ्या. गिरवा. लिहा. (४.१.१)

द

ड

ई

झ

■ रिकाम्या जागी 'ड' लिहा. शब्द वाचा. (४.१.१, ३.१.३)

**फ... फ... ब... ब... ग... ग...**

■ ऐका. तालात म्हणा. (२.१.१)

**ढुम ढुम ढुमाक**
**ढुम ढुम ढुमाक**

१. | ल | श | ह | अं | ि | ं |
|---|---|---|---|---|---|













विमान सायकल शहर अंबारी

| सायकल | शहर | अंबारी | विमान |
|---|---|---|---|

| ल | श | ह | अं | अ + ं = अं | व + ि = वि |
|---|---|---|---|---|---|

शिवाजी विळी विहीर लवंग

३.१.१, ३.१.२, ३.१.३, ४.१.१

## स्वाध्याय

■ खालील शब्दांतील ल, श, ह, अं या अक्षरांखाली रेघ ओढा. वाचा. (३.१.१, ३.१.२, ३.१.३)

**विमल हसन अंजली यशपाल**

**सहल अंगण**

■ पाहा. समजून घ्या. वाचा. (३.१.२)

**ह + ि = हि** **प + ि = पि**

**फ + ि = फि** **ग + ि = गि**

**ग + ं = गं**

**म + ं = मं**

**र + ं = रं**

■ पाहा. समजून घ्या. गिरवा. लिहा. (४.१.१)

**ह** ..........

..........

**अं** ..........

..........

**ल** ..........

..........

श

ए

ऐ

खालील शब्द वाचा. पाटीवर लिहा. (३.१.३, ४.१.१)

**रंगत संगत**

**अंगत पंगत**

**गंमत जंमत**

**किसन** **लीला**

**शशिकला** **नलिनी**

तालात वाचा. (३.१.३)

**अंगत पंगत**

**घडली संगत**

**गमाडी गंमत**

**जमाडी जंमत**

## १०. | इ | ट | ठ | छ | े |


इमारत


टपालपेटी


छत


कठडा

| कठडा | छत | इमारत | टपालपेटी |
|---|---|---|---|

| इ | ट | ठ | छ | प + े = पे |
|---|---|---|---|---|

पाट माठ इसाप छकडा खेळ

३.१.१, ३.१.२, ३.१.३, ४.१.१

या पाठाच्या स्वाध्यायात प्रथमच वाक्ये लिहायला दिली आहेत. या पुढील पाठात वाचनाबरोबर शब्द व छोटी छोटी वाक्ये लिहिण्याचा सराव द्यावा.

## स्वाध्याय

- चौकोनातील अक्षर वाचा. त्या अक्षराभोवती (O) गोल करा. (३.१.२, ३.१.१)

| | | |
|---|---|---|
| ट | टकटक | टकमक |
| ठ | ठकठक | ठकाठक |
| छ | छमछम | छमाछम |

- पाहा. समजून घ्या. वाचा. (३.१.२)

ट + े = टे

ठ + े = ठे

ढ + े = ढे

क + े = के

प + े = पे

ल + े = ले

ळ + े = ळे

- वाचा. (३.१.३)

केळी पेढे टेकडी ठेव

फुले फळे घरटे

■ पाहा. समजून घ्या. गिरवा. लिहा. (४.१.१)

ठ

ट

ड

घ

छ

य

■ वाचा. लिहा. (३.१.३, ४.१.१)

रमेश बागेत जा.

फुले, फळे आण.

महेशला फुले दे.

केशरला फळे दे.

## ११. 

| थ | ष | ध | च | भ | ू | ो | ै | ौ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|

एकनाथ, कैलास, दौलत
भरभर चला.
सुषमा, मधू समोर बघा.
अबब !
केवढे मोठे धरण !
पाणीच पाणी
खूप खूप पाणी.



| धरण | सुषमा | एकनाथ | भरभर | चल |
|---|---|---|---|---|

| भ | ष | ध | च | थ |
|---|---|---|---|---|

| | |
|---|---|
| ध + ू = धू | म + ो = मो |
| क + ै = कै | द + ौ = दौ |

३.१.१, ३.१.२, ३.१.३, ४.१.१, ९.१.१

## स्वाध्याय

■ खालील शब्दांतील थ, ष, ध, च, भ या अक्षरांखाली रेघ ओढा. वाचा. (३.१.१, ३.१.२, ३.१.३)

**चहा थवा औषध भजन चढ**

■ पाहा. समजून घ्या. वाचा. (३.१.२)

| | |
|---|---|
| ध + ू = धू | ध + ो = धो |
| च + ू = चू | च + ो = चो |
| थ + ू = थू | थ + ो = थो |
| भ + ू = भू | भ + ो = भो |
| र + ू = रू | र + ो = रो |
| च + ै = चै | च + ौ = चौ |
| प + ै = पै | प + ौ = पौ |
| ह + ै = है | ह + ौ = हौ |

■ वाचा. पाटीवर लिहा. (३.१.३, ४.१.१)

**मधू धोतर पाखरू रोप**

**भूक भोपळा नथू थोरला**

**चूल पाचोळा मूठ मोर**

■ वाचा. पाटीवर लिहा. (३.१.३, ४.१.१)

**गौरव मैना फौज पैठण**

■ पाहा. समजून घ्या. गिरवा. लिहा. (४.१.१)

थ

ध

ष

भ

ज

च

■ वर्तुळाबाहेरील प्रत्येक अक्षर वर्तुळातील 'ल' या अक्षराशी जोडून शब्द तयार करा. सांगा. (१.१.१)



# १२. मुळाक्षरे

अ आ इ ई उ ऊ ऋ

ए ऐ ओ औ अं अः

क ख ग घ ङ

च छ ज झ ञ

ट ठ ड ढ ण

त थ द ध न

प फ ब भ म

य र ल व

श ष स ह ळ क्ष ज्ञ

'क्ष' आणि 'ज्ञ' ही अक्षरे उच्चारण्यास कठीण म्हणून त्यांचा समावेश या पुस्तकाच्या भाग २ मधील पाठ क्र. १४ आणि १६ मध्ये करण्यात आला आहे. कमी वा क्वचित वापरात येणाऱ्या अक्षरांचा परिचय या वर्गात अपेक्षित नाही. उदा. ॠ, ङ, ञ, अः (३.१.२)

## स्वाध्याय

- मुळाक्षरांपासून तयार होणारे शब्द सांगा. (१.१.१)
- गाळलेल्या जागी योग्य अक्षर भरा व स्वरचिन्ह जोडा. (४.१.२)

| अ | आ | इ | ई | उ | ऊ | ए | ऐ | ओ | औ | अं | अः |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| — | ा | ि | ी | ु | ू | े | ै | ो | ौ | ं | ः |
| क | का | कि | की | कु | कू | के | कै | को | कौ | कं | कः |
| च | चा | | | | | | | | चौ | | |
| ट | | टि | | | | | | | | टं | |
| त | | | ती | | | | | | | | तः |
| प | | | | पु | | | | | | पं | |
| स | | | | सु | | | | | | सं | |
| ह | | | ही | | | | | | | | हः |
| ज | | जि | | | | | | | | जं | |
| य | या | | | | | | | | यौ | | |
| न | | | | | | ने | | | | | नः |

सोबतचा तक्ता पूर्ण केल्यानंतर क्रमाने उभा व आडवा वाचून घ्यावा. याप्रमाणे इतर अक्षरांचा तक्ता विद्यार्थ्यांकडून करून घ्यावा. अक्षरांचे गट आणि त्यांचा क्रम एकदम माहीत करून देण्याची आवश्यकता नाही. अक्षर ओळख आल्यानंतर १२ व्या पाठात त्यांचा क्रम दिला आहे. तसेच स्वरचिन्हांचा क्रम या पुस्तकाच्या भाग दोन मधील पाठ क्रमांक १ ते ८ मध्ये दिला आहे. विसर्गाचे शब्द आणि ङ, ञ ही अनुनासिके आणि 'ऋ' हे स्वर इत्यादी वरच्या इयत्तांमध्ये शिकवावे.

वाचा.

कमल कागद किसन

तिकीट कुणाल काकू

केशव कैलास कोमल

कौरव कंगवा

## नमुना चाचणी दुसरी

(एकेका क्षमतेसाठी किमान पाच प्रश्न विचारावेत.)

**चौकोनात दिलेल्या अक्षरापासून सुरू होणाऱ्या शब्दाभोवती गोल करा.** (३.१.१)

जसे – [अ] कमर (अमर) समर

[न] पळ वळ नळ

[झ] गपकन झपकन टपकन

[स] वडा सडा पडा

[ष] षटकोन पटकन फटकन

**पाहा. ओळखा. वाचा. चित्र आणि शब्द यांच्या जोड्या जुळवा.** (३.१.१)

(एका बाजूला प्राण्यांची चित्रे आणि दुसऱ्या बाजूला त्यांची नावे लिहिलेला तक्ता मुलांना दाखवावा. एकेका मुलाला बोलावून जोडी जुळवायला सांगावे.)

**पाहा. लिहा.** (४.१.१)

बडबड ............ टपटप ............ भात ............ बाळ ............

छान ............ शाळा ............ दात ............ पाठ ............

**शिक्षकाने सांगून विद्यार्थ्यांनी पाटीवर लिहावे.** (४.१.२)

मासा गाय सदरा बदक कपाट ऊस

घर अजगर ओढणी फणस आई ऐक

**परिसरात सहज उपलब्ध असणाऱ्या पुढीलपैकी कोणत्याही पाच-सहा वस्तू विद्यार्थ्यांपुढे ठेवाव्या. त्यांपैकी, विद्यार्थ्यांस आवडेल त्या तीन वस्तूंविषयी काही प्रश्न विचारून विद्यार्थ्यांस बोलते करावे.** (२.१.३)

वस्तू – चाळणी, वाटी, टोपली, पिशवी, बाहुली, चेंडू, पाटी, पुस्तक

(प्रश्नांसाठी मुद्दे – • वस्तूचे नाव, रंग, आकार याविषयी • कोण वापरते ? कशासाठी ?
• विद्यार्थ्याने ती वस्तू एरवी कोठे पाहिली आहे ?)

**कोण ते ओळखा.** (१.१.२)

शिक्षकाने वर्णन करावे. कोण ते विद्यार्थ्यांस ओळखण्यास सांगावे.

(१) त्याचा रंग काळा आहे. तो काव काव ओरडतो. इकडून तिकडे उडत जातो.

(२) त्याचा आकार गोल आहे. ते टिक् टिक् टिक् टिक् करते. सगळ्यांना वेळ दाखवते.

(३) त्याचा रंग हिरवा असतो. वारा आला की ते हलते. उन्हात आपल्याला सावली देते.

(४) ते कागदांचे असते. त्यात चित्रे असतात, गोष्टी असतात. आपल्या दप्तरात ते आहे !

